**जागतिक बँकेच्या माध्यमातून राज्यात राबविण्यात येणा-या महाराष्ट्र स्पर्धाक्षम कृषि विकास प्रकल्पाकरिता निधी उपलब्ध करुन देण्याबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्रमांक -बासप्र-२००९/प्र.क्र.८४/२१स**
**मंत्रालय विस्तार,मुंबई-४०००३२**
**दिनांक २८/०७/२००९**

**वाचा - १. शासन निर्णय सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र. कृबास-२००७/प्रक्र.४०/११-स,दि.३१ डिसेंबर,२००७**
**२. प्रकल्प संचालक, महाराष्ट्र राज्य कृषि पणन मंडळ,पुणे यांचे पत्र जा.क्र. /एमएसीपी/बीडीएस/६५/२००९, दिनांक २.७.२००९.**
**३. शासन पत्र सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र. पूरक १००८/प्र.क्र.६६/१७-स, दि. ०६/०७/२००९**

**प्रस्तावना-**

महाराष्ट्र शासनामार्फत जागतिक बॅंकेच्या सहकार्याने राज्यामध्ये महाराष्ट्र स्पर्धाक्षम कृषि विकास प्रकल्प राबविण्यात येत आहे. या प्रकल्पाकरिता संदर्भ क्रमांक १ नुसार महाराष्ट्र राज्य कृषि पणन मंडळाची नोडल एजन्सी म्हणून नियुक्ती करण्यात आलेली आहे. सदर प्रकल्पाच्या उभारणी व अंमलबजावणीकरिताच्या प्रकल्प समन्वयन कक्षाची व प्रकल्प अंमलबजावणी कक्षाची स्थापना करण्यात आली असून तेथे प्रतिनियुक्तीने अधिकारी व कर्मचारी यांची नियुक्ती करण्यात आलेली आहे. कृषि पणन मंडळामार्फत संदर्भ क्रमांक २ अन्वये प्राप्त झालेल्या प्रस्तावाच्या अनुषंगाने या प्रकल्पास सन २००९-१० करिता या प्रकल्पासाठी रु २५ कोटी इतकी रक्कम अर्थसंकल्पीत करण्यात आली आहे. सदरचा निधी महाराष्ट्र स्पर्धाक्षम कृषि विकास प्रकल्पास उपलब्ध करुन देण्याबाबत शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे-

**शासन निर्णयः-**

१. राज्यात महाराष्ट्र स्पर्धाक्षम कृषि विकास प्रकल्प राबविण्याकरिता येणा-या खर्चाकरिता महाराष्ट्र कृषि पणन मंडळास रु. ९९,०७,००० /- ( रुपये नव्यान्नव लाख सात हजार फक्त) इतका निधी मंजूर करण्यात येत आहे.

२. सदर रक्कम कृषि पणन मंडळाला वितरित करण्यासाठी सहसंचालक (पणन), पणन संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रण अधिकारी म्हणून व लेखाधिकारी , पणन संचालनालय, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून शासनाच्यावतीने प्राधिकृत करण्यात येत आहे. पणन

संचालनालयाने सदर रक्कम शासकीय कोषागारातून महाराष्ट्र राज्य कृषि पणन मंडळ, पुणे यांना वितरित करुन त्याचा अहवाल शासनास सादर करावा.

३. या शासन निर्णयान्वये मंजूर केलेल्या निधीचा विनियोग ज्या कारणास्तव मंजूर केलेला आहे, त्याच कारणासाठी करत असल्याबाबत पणन संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी खात्री करावी आणि यासंदर्भातील अनुपालन अहवाल शासनास सादर करावा.

४. महाराष्ट्र स्पर्धाक्षम कृषि विकास प्रकल्पाच्या खर्चाकरिता या शासन निर्णयाव्दारे मंजूर करण्यात येणा-या रु. ९९,०७,०००/- रक्कम ही या प्रकल्पातील राज्य शासनाचा वाटा म्हणून देण्यात येत आहे. या रक्कमेची Retroactive Financing व्दारे जागतिक बँकेकडून प्रतिपूर्ती मिळाल्यानंतर सदर रक्कम राज्य शासनाच्या या प्रकल्पातील एकूण वाटयाच्या रक्कमेत वर्ग करण्यात यावी.

५. राज्य शासनाच्या या प्रकल्पातील वाटयाकरिता रु. ९९.०७ लाख इतका निधी पुढील लेखाशीर्षाखाली माहे जुलै ते नोव्हेंबर, २००९ साठी उपलब्ध करुन देण्यात येत असून सदरचा खर्च मासिक निधी वितरण प्रणालीप्रमाणे करावा.

मागणी क्र. व्ही-५
मुख्य लेखाशिर्ष ६४२५, सहकारासाठी कर्जे
(००)१०८),इतर सहकारी संस्थांना कर्जे
(०१) (१८), महाराष्ट्र स्पर्धाक्षम कृषि विकास प्रकल्प ( जागतिक बॅंक सहाय्यीत)
५५, कर्ज व आगाऊ रकमा.
(६४२५-०६३-६ दत्तमत)

६. सदर शासन निर्णय शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक सांकेताक २००९०७२८१४२४४१००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( ना. ल. तडोसे)
सह सचिव, महाराष्ट्र शासन
सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग

प्रति,

१. महालेखापाल,महाराष्ट्र-१,(लेखा व अनुज्ञेयता)(लेखापरीक्षा),मुंबई
२. महालेखापाल,महाराष्ट्र-२,(लेखा व अनुज्ञेयता)(लेखापरीक्षा),नागपूर
३.सहकार आयुक्त व निबंधक,सहकारी संस्था,महाराष्ट्र राज्य,पुणे
४. पणन संचालक,महाराष्ट्र राज्य,पुणे (५ प्रती)
५.कार्यकारी संचालक, कृषि पणन मंडळ, पुणे (३ प्रती)
६.प्र. प्रकल्प संचालक, महाराष्ट्र स्पर्धाक्षम कृषि विकास प्रकल्प, पुणे.

७.सहसंचालक लेखा व कोषागारे ,संगणक कक्ष,५ वा मजला,नवीन प्रशासन भवन, मंत्रालयासमोर,मुंबई ४०००३२
८. जिल्हा कोषागार अधिकारी,पुणे (३ प्रती)
९. निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई
१०.अधिदान व लेखा अधिकारी,मुंबई
११. वित्त विभाग (व्यय-२/शासन हमी/अर्थसंकल्प-१२),मंत्रालय,मुंबई
१२. कक्ष अधिकारी १७-स,सहकार पणन व वस्त्रोद्योग विभाग,मंत्रालय,मुंबई
१३. कक्ष अधिकारी (संगणक कक्ष),सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग,मंत्रालय,मुंबई
१४. निवड नस्ती